**नियोजन विभाग व विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये ई-ऑफिस प्रणालीच्या माध्यमातून नस्त्या सादर करणेबाबत. .....**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण-४०२३/प्र.क्र.२७१/का.१४२१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०२३

**संदर्भ :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-मातंसं-२०२२/प्र.क्र.१३१/से-१/का.३९, दिनांक २३ डिसेंबर,२०२२.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०२/१८(र.व का.), दिनांक २ फेब्रुवारी, २०२३.
३) शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०७/का.१४२३, दिनांक १४ मार्च, २०२३.

**प रि प त्र क**

राज्य शासनाच्या शासकीय कामकाजात संगणकाचा अधिकाधिक वापर करुन शासकीय कामकाज गतीमान व्हावे, कामकाजात सुसुत्रता यावी, दस्तावेज व माहिती सुरक्षित, त्वरेने व जलद गतीने प्राप्त होवून निर्णय प्रक्रिया सुलभ व्हावी यासाठी मंत्रालयीन विभागांमधील तसेच क्षेत्रीय कार्यालयातील शासकीय कामकाजात ई-ऑफिस प्रणालीचा प्रभावीपणे वापर करुन सदर प्रणाली कार्यन्वित करण्यासाठी व सदर ई ऑफिस प्रणालीचे मंत्रालय स्तरावर संचालन करण्यासाठी संदर्भ क्रमांक-१ अन्वये समिती स्थापन करण्यात आली आहे.

२. सदर समितीद्वारे मंत्रालयातील व क्षेत्रीय कार्यालयातील कामकाजात ई ऑफिस प्रणालीचा प्रभावी वापर करण्याच्या अनुषंगाने आढावा बैठक घेण्यात येते. सदर आढावा बैठकीमध्ये विभागात ई-ऑफिस प्रणालीचा वापर व त्याबाबतची अंमलबजावणी कितपत करण्यात आली आहे याबाबतचा आढावा घेण्यात येत आहे. नियोजन विभागातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांना ई-ऑफिस प्रणालीचे प्रशिक्षण देण्यात आलेले आहे.

३. नियोजन विभागातील सर्व कार्यासनांनी तसेच विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी त्यांच्याकडे नव्याने सुरु करण्यात येणाऱ्या नस्त्या सादर करताना ई-ऑफिस प्रणालीचा वापर करुनच सादर कराव्यात.

४. तसेच विकास क्षेत्र कार्यासनांनी त्यांच्याकडे इतर प्रशासकीय विभागांकडून येणारे अनौपचारिक संदर्भ संबंधित विभागांकडून ई-ऑफिसद्वारे पाठविण्याबाबत आग्रह धरावा. ई-ऑफिस प्रणालीचा प्रभावी वापर करताना येणाऱ्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी ई-ऑफिस

संबंधित तांत्रिक सहाय्य करणाऱ्या चमूची मदत घ्यावी व ई-ऑफिस प्रणालीचा काटेकोरपणे अवलंब करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६२८१९१८५५१९१६ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH
KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2023.06.30 12:16:11 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना महाराष्ट्र, नागपूर.
२. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, अदालत रोड, औरंगाबाद.
३. सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ, नागपूर/मराठवाडा विकास मंडळ, औरंगाबाद/ उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई
४. उपाध्यक्ष, महाराष्ट्र इन्स्टिट्यूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन-मित्र, मुंबई
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई.
६. संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र नागपूर, व्हीएनआयटी परिसर, साऊथ अंबाझरी रोड, नागपूर ४४००११.
७. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपति शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
८. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई
९. सह सचिव / उप सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.
१२. प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव (रोहयो) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. विशेष कार्य अधिकारी (का.१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी व संशोधन अधिकारी (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१७. निवड नस्ती, कार्यासन-१४२१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.